**राज्यातील पोलीस नियंत्रण कक्षांचे आधुनिकीकरण प्रकल्पासाठी सल्लागार म्हणून नियुक्त केलेल्या मे. अर्नेस्ट अँड यंग या सल्लागार कंपनीस केलेल्या कामाचे देयक अदा करणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः सीसीटी -३६१८/प्र.क्र.८७/पोल-३**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, २ रा मजला, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक : १४.०२.२०२०

**वाचा:**

१. माहिती व तंत्रज्ञान संचालनालय, शासन निर्णय क्रमांक : GAD-मातंस ०८०/४/२०१४-O/O DIRECTORATE OF IT-DIT (MH), दि.०१.०७.२०१४, दि.१९.०७.२०१७ व दि.०९.१०.२०१७.
२. गृह विभाग, शासन निर्णय क्रमांक : गृहआ-२०१५/प्र.क्र.२३०/आस्थापना-२, दि. २०.०५.२०१५.
३. गृह विभाग, पत्र क्रमांक: सीसीटी ३६१३/प्र.क्र.१४०/भाग-१/पोल-३, दिनांक ०५.११.२०१६.
४. गृह विभाग, पत्र क्रमांक: सीसीटी ३६१६/प्र.क्र.१४०/भाग-१/पोल-३, दिनांक ०६.०१.२०१७ व दि.२७.१०.२०१७
५. गृह विभाग, पत्र क्रमांक: सीसीटी ३६१६/प्र.क्र.१४०/भाग-१/पोल-३, दिनांक ३०.०३.२०१९.
६. मे.अर्नेस्ट अँड यंग या सल्लागार कंपनीची दि.०५.१२.२०१९ चे देयके.

**प्रस्तावना :-**

राज्यातील नागरिकांना आपत्कालीन परिस्थितीत पोलीस सेवा उपलब्ध करून देण्याकरीता राज्यातील पोलीस नियंत्रण कक्षांचे आधुनिकीकरण प्रकल्प राबविण्यासाठी प्रकल्प सल्लागार म्हणून मे. अर्नेस्ट अँड यंग या सल्लागार कंपनीची दि.५.११.२०१६ च्या पत्रान्वये नियुक्ती करण्यात आली असून त्यानुसार सदर कंपनीस दिनांक ६ जानेवारी,२०१७ रोजीच्या पत्रान्वये कार्यादेश देण्यात आले आहेत. तसेच त्यानंतर सदर कंपनीस दिनांक ३० मार्च २०१९ रोजीच्या पत्रान्वये सुधारीत कार्यादेश देण्यात आले आहेत. त्यानुसार सदर प्रकल्पासाठी मे.अर्नेस्ट अँड यंग या सल्लागार या कंपनीला माहिती व तंत्रज्ञान विभागाच्या दि.१.७.२०१४ च्या शासन निर्णयान्वये निश्चित केल्यानुसार प्रतिव्यक्ती -प्रतिमहा (Man-Months) तत्वावर मानधन अनुज्ञेय करण्यात आले आहे. सदर कंपनीने उपरोक्त प्रकल्पासंदर्भात Program Management Pre-Go-Live दि.१५ मे २०१९ ते १५ नोव्हेंबर २०१९ या टप्प्यांसाठी पाहिलेल्या कामाची देयके अदा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुषंगाने शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :-**

राज्यातील पोलीस नियंत्रण कक्षांचे आधुनिकीकरण प्रकल्पासाठी मे. अर्नेस्ट अँड यंग या सल्लागार कंपनीची प्रकल्प सल्लागार म्हणून नियुक्ती करण्यात आली आहे. माहिती व तंत्रज्ञान विभाग, शासन निर्णय दि.०१.०७.२०१४ अन्वये निश्चित केल्यानुसार त्यांना मानधन अनुज्ञेय करण्यात आले आहे. त्यानुसार मे.अर्नेस्ट अँड यंग कंपनीला राज्यातील पोलीस नियंत्रण कक्षांचे आधुनिकीकरण प्रकल्पासाठी प्रकल्प सल्लागार म्हणुन Program Management Pre-Go-Live दि.१५ मे २०१९ ते १५ नोव्हेंबर २०१९ या टप्प्यासाठी रु.२७,६७,१००/- (अक्षरी रुपये सत्तावीस लाख सदुसष्ठ हजार शंभर फक्त) एवढ्या रकमेची देयके अदा करण्यास मंजूरी देण्यात येत आहे.

२. सदर देयकांचा सविस्तर तपशिल खालीलप्रमाणे आहे:-

राज्यातील पोलीस नियंत्रण कक्षांचे आधुनिकीकरण प्रकल्पासाठी प्रकल्प सल्लागार म्हणुन Program Management Pre-Go-Live या टप्प्यासाठी मे.अर्नेस्ट ॲंड यंग कंपनीने पाहीलेल्या कामासाठीच्या रु.२७,६७,१००/- (अक्षरी रुपये सत्तावीस लाख सदुसष्ठ हजार शंभर फक्त) एवढ्या रकमेच्या देयकाचा तपशील पुढीलप्रमाणे आहे :-

**तक्ता क्र. १**

| SL No | Invoice No. for Total Duration ( Pre Go live) | Milestone | Resource Name | Designation | Duration ( Month) | Man Month rate as per GoM GR dated 1-7-2014 in INR | Deployment ( Percentage) | Applicable Amount per Resource (INR) | Total applicable amount | OPE Claimed | CGST@9 % | SGST@9% | Total Amount |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| A | B | C | D | E | F | G | H | I = G*H | J | K | L | M | N=J+L+M |
| 1 | 15th May '19 to 15th Nov '19 | Project Monitoring Support during Implementation | Ashish Singh | Principal Consultant | 3 | 275,000 | 100% | 825,000 | 2,345,000 | 0 | 74250.00 | 74250.00 | 973,500 |
| 2 | | | Harsh Vashishth | Senior Consultant | 4 | 220,000 | 100% | 880,000 | | 0 | 79200.00 | 79200.00 | 1,038,400 |
| 3 | | | Shilpa Sansare | Consultant | 4 | 160,000 | 100% | 640,000 | | 0 | 57600.00 | 57600.00 | 755,200 |
| | | | | | | | | | | | | Total | 2,767,100 |

**टीप:-**

अ) उपरोक्त देयक या संदर्भात नमुद शासन निर्णय संदर्भ क्र.१ मध्ये नमुद केल्यानुसार सदर प्रकल्पासाठी सल्लागारांना दरमहिना दरमाणुस (Man-Month) तत्वानुसार अदा करण्यात येत आहे.

ब) शासन निर्णय संदर्भ क्र. १ नुसार सल्लागारांना प्रकल्पावर होणा-या खर्चाच्या ५% च्या प्रमाणात प्रवास,भोजन व निवास इ.खर्च अनुज्ञेय करण्यात आला आहे.

क) संदर्भ क्र.५ अन्वये मे.अर्नेस्ट ॲंड यंग कंपनीने सादर केलेल्या देयकानुसार सदर रकमा अदा करण्यास मंजूरी देण्यात येत आहे. सदर रकमांमध्ये १८% वस्तू आणि सेवा कर समाविष्ट करण्यात आला आहे.

ड) सदर प्रकल्पासाठी संबधित कंपनीला सल्लागारांच्या मानधनापोटी जादा रक्कम अदा केली आली आहे असे निदर्शनास आल्यास सदर जादा रक्कम संबधित कंपनीकडून समायोजीत करण्याचा अधिकार शासनास राहील.

इ) सदर देयके आयकर व इतर कर वजाती करून अदा करण्यात यावी.

३. प्रस्तुत प्रकरणी येणारा खर्च "मागणी क्र.१, २०५५- पोलीस (००) ११५, पोलीस दलाचे आधुनिकीकरण (०१) विविध तंत्रज्ञान विकास प्रकल्प (०१) (०१) तंत्रज्ञान विकास प्रकल्प (२०५५ ए०३२), १३ कार्यालयीन खर्च"या लेखाशीर्षाखाली टाकून तो सन २०१९-२० या आर्थिक वर्षातील मंजुरी अनुदानातून भागविण्यात यावा.

४. सदर निधी कोषागारातून आहरित करण्यासाठी विशेष पोलीस महानिरीक्षक,सायबर, मुंबई यांना "नियंत्रक अधिकारी" म्हणून घोषित करण्यात येत आहे व त्यांच्या अधिनस्त आहरण व संवितरण अधिकाऱ्याला "आहरण व संवितरण अधिकारी" म्हणून घोषित करण्यात येत आहे

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००२१४१७४१२४७०२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Dinesh Appaji Saste

Digitally signed by Dinesh Appaji Saste
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a49495d0d4b31e36ff1d612a85453ca984b74e28fd6f99cdf66e3e499969e942, cn=Dinesh Appaji Saste
Date: 2020.02.14 17:43:33 +05'30'

**( दिनेश सस्ते )**
**कार्यासन अधिकारी, गृह विभाग**

**प्रत :**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. प्रधान महालेखाकार (लेखा परीक्षा)-१, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई / नागपूर.
५. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
७. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
८. सहसंचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष,नवीन प्रशासकीय भवन,मंत्रालय, मुंबई.
९. मे.अर्नेस्ट अँड यंग कंपनी, १४ वा मजला, द रुबी, २९, सेनापती बापट मार्ग, दादर(पश्चिम), मुंबई-४०० ०२८.
१०. अर्थ शाखा, गृह विभाग.
११. निवड नस्ती / पोल-३.

*****